**विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग, मुंबई व आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई कार्यालयांसाठी वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई येथील जागा भाडेतत्वावर घेण्यासाठी मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पीएडब्ल्यू-०६१८/प्र.क्र.४३२/विशा-६**

मंत्रालय, मुबंई-४०० ०३२

दिनांक :- २४/०८/२०१८

संदर्भ :- १) विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य मुंबई यांचे पत्र क्र. पो.म.स./४२/१/ मअप्रवि/संकिर्ण ०४१८/१११/१८ दि. १६/०४/२०१८ चे पत्र

२) अपर पोलीस महासंचालक ( नि.व.स.), पोलीस महासंचालक कार्यालय, मुंबई यांचे पत्र क्र. पोमसं/२७-ब/२८बी-२/जागा-मअप्रवि/२९०/२०१८ दि. ०९/०८/२०१८ चे पत्र

३) कार्यकारी अभियंता, इलाखा शहर( सां.बा. )विभाग,मुंबई यांचे क्र. इशवि/८५०८, दि. ०४/०८/२०१८ चे पत्र

प्रस्तावना -

विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग हा नागरी हक्क संरक्षण विभागापासून विभक्त झाल्यापासून त्या कार्यालयास कार्यालयीन कामकाजासाठी पोलिस महासंचालक कार्यालय येथे पुरेशी जागा उपलब्ध नसल्याने सदर विभागास अद्याप जागा उपलब्ध करून दिलेली नाही. त्यामुळे कामकाज करण्यास अडचणी निर्माण होत आहे. याबरोबरच अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई कार्यालयास देखील कार्यालयीन कामकाजासाठी जागेची आवश्यकता असल्याचे निदर्शनास आल्यामुळे वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई या खाजगी इमारतीतील जागा विशेष पोलीस महानिरिक्षक,महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग व अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई या दोन्ही कार्यालयांसाठी भाडे तत्त्वावर घेण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णयः-

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य यांनी विशेष पोलीस महानिरीक्षक, महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग, मुंबई व अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई या दोन कार्यालयांच्या कार्यालयीन कामकाजासाठी **सेंटर -१, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई** येथील जागा कार्यकारी अभियंता, इलाखा शहर ( सा.बां.) विभाग, मुंबई यांनी रु.२२५/- अधिक अनुषंगिक खर्च या दराने परिगणना केल्यानुसार खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार भाडे तत्वावर घेण्यास अटी व शर्थी नुसार मान्यता देण्यात येत आहे .

| मजला | कार्यालय | वापर | जागा |
|---|---|---|---|
| १८ | आर्थिक गुन्हे शाखा, | कार्यालयीन | युनिट क्र. ३- १००८.५३ चौ. फूट ( फर्निचर सह ) |
| १२ | महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग | कार्यालयीन | युनिट क्र. ३- १३१०.०० चौ. फूट |
| ११ | महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग / आर्थिक गुन्हे शाखा | परिषद सभागृह (आवश्यकतेनुसार दोन्ही कार्यालयांच्या बैठकांसाठी ) | युनिट क्र. ३- ५५७.०० चौ. फूट |
| ०७ | महिला अत्याचार प्रतिबंधक विभाग | ग्रथांलय व अभिलेख | युनिट क्र. ५- ६०४.५१ चौ. फूट ( फर्निचर सह ) |

**The term& conditions for vacant spaces in centre 1 & Arcade building are as under :-**

1) The compensation charges in centre 1 building for furnished are Rs. 225/- per sq.ft.per month plus the common outgoings at the rate of Rs. 17.30 plus (subject to increase & decrease)+G.S.T. on both and property Tax at the rate of Rs.5.70/-
2) The compensation charges in centre 1 building for Unfurnished are Rs. 200/- per sq. ft. per month plus the common outgoings at the rate of Rs. 17.30 plus (subject to increase and decrease) + G.S.T. on both and Property Tax at the rate of Rs. 5.70
3) In addition to the above, interest free refundable security deposit equivalent to 3 month compensation charges + common outgoings+ G.S.T and Property Tax is payable
4) Parking charges would be Rs. 3000/- + G.S.T per car park per month depending on the availability
5) Leave & License agreement period would be for 3 years.
6) Electricity charges will be as per actual consumption.

सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस (०१)(००) ,जिल्हा पोलीस बल ( दत्तमत) ( अनिवार्य) ( २०५५ ०१६८ ) अंतर्गत १४ - भाडे पट्टी व कर” या लेखाशिर्षाखालील सन २०१८-१९ या वर्षासाठी मंजुर अर्थसंकल्पीय निधीतून खर्ची घालण्यात यावा.

सदर आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८,भाग -पहिला, उपविभाग - एक अ.क्र. १० मधील ११५ आणि महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम १४७ ( क) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०८२४१५०७५५३६२९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

V. M. Bhat

Digitally signed by V. M. Bhat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, cn=V. M. Bhat
Date: 2018.08.24 15:11:25 +05'30'

**( व्यं .मा. भट )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२) अपर पोलीस महासंचालक, आर्थिक गुन्हे शाखा, मुंबई

३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.

४) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

७) विशेष पोलीस महानिरीक्षक (का. व. सु.), महाराष्ट्र राज्य मुंबई

८) विशेष पोलीस महानिरीक्षक, म.अ.प्र.वि., मुंबई.

९) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/ नागपूर/ पुणे/ सोलापूर/ सांगली/ कोल्हापूर/ बीड/ यवतमाळ/ अहमदनगर.

१०) अवर सचिव, गृह विभाग/ अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई.

११)वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.